वेबसाईट विकसित करण्याच्या प्रकल्पावर संनियंत्रण करुन निर्णय घेण्यासाठी विभाग स्तरावर समिती गठीत करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
## शासन निर्णय क्रमांकः बैठक-२०२२/प्र.क्र.१अ/१६-स

१४ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २८ जून, २०२३

**वाचा :-**

१) विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दि.०८.०४.२०२२ रोजीच्या बैठकीचे कार्यवृत्त.
२) शासन निर्णय,सामान्य प्रशासन (माहिती तंत्रज्ञान) विभाग,क्र.GAD-मातंसं ०८०/४/२०१४-O/O DIRECTORATE OF IT-DIT (MH), दि.२०.०३.२०१८.
३) विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दि.२५.०५.२०२२ रोजीच्या बैठकीचे कार्यवृत्त.
४) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, कार्यादेश क्र. बैठक-२०२२/प्र.क्र.०१/१६-स, दि.०८.०६.२०२२.
५) विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दि.१७.०२.२०२३ रोजीच्या बैठकीचे कार्यवृत्त.
६) विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दि.२८.०४.२०२३ रोजीच्या बैठकीचे कार्यवृत्त.
७) मा.अपर मुख्य सचिव (सहकार व पणन) यांचे अध्यक्षतेखालील दि.२३.०६.२०२३ रोजीच्या बैठकीचे कार्यवृत्त.

**प्रस्तावना:-**

सहकार विभागाच्या विविध वेबसाईट ऐवजी एकच परिपूर्ण वेबसाईट नव्याने विकसित करण्याचा निर्णय विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दि.०८.०४.२०२२ रोजीच्या बैठकीमध्ये घेण्यात आला. माहिती तंत्रज्ञान विभागाच्या दि.२०.०३.२०१८ च्या शासन निर्णयामध्ये सुचीबद्ध करण्यात आलेल्या संस्थांनी विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दि.२५.०५.२०२२ रोजीच्या बैठकीत सादरीकरण केले. सदर सादरीकरणामध्ये मिळालेल्या मुल्यांकन अहवालामधील गुणांकनाच्या आधारे M/s PwC या संस्थेची निवड करण्यात आली. त्यानुसार सदर प्रकल्पाकरिता ४ तांत्रिक मनुष्यबळाची नियुक्ती देण्याचे कार्यादेश दि.०८.०६.२०२२ रोजी M/s PwC संस्थेस देण्यात आले. उक्त प्रकल्पाबाबत M/s PwC संस्थेने तयार केलेला सविस्तर प्रकल्प अहवाल (DPR) विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दि.१७.०२.२०२३ रोजीच्या बैठकीमध्ये मान्य करण्यात आला व M/s PwC यांना पुढील बैठकीत Request For Proposal (RFP) सादर करण्याच्या सुचना देण्यात आल्या. त्यानुसार M/s PwC संस्थेने तयार केलेले Request For Proposal (RFP) विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दि.२८.०४.२०२३ रोजीच्या बैठकीमध्ये सादर करण्यात आले. सदर बैठकीत सविस्तर प्रकल्प अहवाल (DPR) मध्ये नमूद विविध मॉड्युल्स व त्यासंबंधीच्या

खर्चासंदर्भात सविस्तर चर्चा झाली. चर्चेअंती जे मॉड्युल्स कार्यरत आहेत त्यांचे Duplication करण्यात येवू नये, याकरिता मॉड्युल्सची संख्या कमी करुन प्रकल्पाची किंमत कमी करण्याचा निर्णय घेण्यात आला.

उक्त प्रकल्पाच्या अनुषंगाने मा.अपर मुख्य सचिव (सहकार व पणन) यांचे अध्यक्षतेखाली विभागातील सह सचिव/उपसचिव यांची दि.२३.०६.२०२३ रोजी बैठक संपन्न झाली. सदर बैठकीत वेबसाईट विकसित करण्याच्या प्रकल्पावर संनियंत्रण करून निर्णय घेण्यासाठी विभाग स्तरावर अपर मुख्य सचिव (सहकार व पणन) यांचे अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्याचे निर्देश देण्यात आले. त्यानुसार सदर समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णयः-

सहकार विभागाच्या विविध वेबसाईट ऐवजी एकच परिपूर्ण वेबसाईट विकसित करण्याच्या प्रकल्पाच्या अनुषंगाने मा. अपर मुख्य सचिव (सहकार व पणन) यांचे अध्यक्षतेखाली दि.२३.०६.२०२३ रोजी झालेल्या बैठकीत दिलेल्या निर्देशाप्रमाणे प्रकल्पावर संनियंत्रण करून निर्णय घेण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (सहकार व पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई | अध्यक्ष |
| २ | संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ३ | सहकार आयुक्त तथा निबंधक, सहकारी संस्था, पुणे | सदस्य |
| ४ | साखर आयुक्त, साखर आयुक्तालय, पुणे | सदस्य |
| ५ | पणन संचालक, पणन संचालनालय, पुणे | सदस्य |
| ६ | सचिव, राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण,पुणे | सदस्य |
| ७ | सर्व सह सचिव/उपसचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ८ | विशेष कार्य अधिकारी तथा सह निबंधक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ९ | श्री.प्रमोद बोरोले, जिल्हा सूचना विज्ञान अधिकारी, पुणे (NIC चे प्रतिनिधी) | सदस्य |
| १० | सह सचिव/उपसचिव (अर्थसंकल्प, ई-गव्हर्नन्स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य-सचिव |

२. उपरोक्त प्रमाणे गठीत केलेल्या समितीने सहकार विभागाशी संबंधित इतर राज्यांनी विकसित केलेल्या मॉड्युल्सचा अभ्यास करून तसेच, राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्राने (NIC) जे नि:शुल्क मॉड्युल्स तयार केलेले आहेत तसेच या संदर्भात केंद्र शासन व राज्य शासनाच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे वेबसाईट तयार करून ती कार्यान्वित करेपर्यंतची सर्व कार्यवाही करावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६२८१३१२५९१४०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NITIN VASANTRAO GAIKWAD

Digitally signed by NITIN VASANTRAO GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=5892c3fd8686c1921e784a3faa9888d155b03f5591ce11b21a1b5006247f6972, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2276AC762AF372D872C2F01D5BB5086166F4A6E20A1BDF9762D556A93F5D118E, cn=NITIN VASANTRAO GAIKWAD
Date: 2023.06.28 13:15:19 +05'30'

**(नितीन गायकवाड)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. अपर मुख्य सचिव (सहकार व पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
३) सहकार आयुक्त तथा निबंधक, सहकारी संस्था, पुणे.
४) साखर आयुक्त, साखर आयुक्तालय, पुणे.
५) पणन संचालक, पणन संचालनालय, पुणे.
६) सचिव, राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण,पुणे
७) सर्व सह सचिव/उपसचिव/ विशेष कार्य अधिकारी तथा सह निबंधक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) श्री.प्रमोद बोरोले, जिल्हा सूचना विज्ञान अधिकारी, पुणे.
९) निवडनस्ती (१६-स).